**महाराष्ट्र नागरी मूलभूत सुविधा निधीची (MUIF) स्थापना**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांक एमआरडी १५०१/प्र.क्र.२५२/नवि-१०.

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक : १९ जुलै, २००२.

**प्रस्तावना :-** महाराष्ट्रातील नागरी लोकसंख्या झपाट्याने वाढत आहे परंतु नागरी सुविधांचा विकास मात्र त्याच वेगाने होऊ शकलेला नाही. नागरी भागातील मूलभूत सुविधांच्या विकासासाठी निधीची एकंदर उपलब्धता ही मोठी अडचण नसून बहुतांशी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये प्रकल्प तयार करण्याचे आणि वित्तीय संस्था व भांडवली बाजारातून निधी उभा करण्यासाठी लागणारे कौशल्य पुरेशा प्रमाणात उपलब्ध नाही. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये जरी अधिक भांडवली गुंतवणूक मिळविण्याची संभाव्य क्षमता असली तरी उत्पन्नात वाढ आणि सुविधा पुरविण्यातील कार्यक्षमता यामध्ये सुधारणा करण्याची त्यांची क्षमता मर्यादित आहे. त्यांच्या अडचणींवर मात करण्यासाठी आणि त्यांच्या भांडवली गुंतवणूक क्षमतेचा विकास करण्यासाठी व प्रोत्साहन देण्याकरिता नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना मदत करणारी कोणतीही यंत्रणा सध्या अस्तित्वात नाही. अशी यंत्रणा उपलब्ध व्हावी म्हणून महाराष्ट्र नागरी मूलभूत सुविधा निधी (MUIF) नावाची एक स्वतंत्र संस्था स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संबंधी शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :-**

(१) महाराष्ट्र नागरी मूलभूत सुविधा निधी (MUIF) स्थापन करण्यात यावा. त्यामध्ये एक विश्वस्त निधी (Trust Fund), महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर फंड ट्रस्टी कंपनी लि. नावाची एक विश्वस्त कंपनी (Trustee Company) व महाराष्ट्र अर्बन इन्फ्रास्ट्रक्चर डेव्हलपमेंट कंपनी लि. नावाची एक मत्ता व्यवस्थापन कंपनी (Asset Management Company) यांचा समावेश असेल.

(२) **ध्येय :-**

सार्वजनिक, खाजगी व सामूहिक क्षेत्रातील सहभागाद्वारे राज्यातील नागरी क्षेत्रात पुरेशा, कार्यक्षम, परवडण्याजोग्या, आधुनिक आणि कायमस्वरुपी अशा नागरी मूलभूत सुविधांच्या विकासासाठी सहाय्य करणे.

**(३) उद्दिष्टये :**

(अ) वित्तीय सहाय्यासाठी योग्य अशा प्रकल्पांच्या निर्मितीद्वारे नागरी मुलभूत सुविधांमधील गुंतवणूक वाढविण्यासाठी भांडवली बाजारातून निधी उभा करण्यास आणि वित्तीय संस्थांकडून प्रत्यक्ष निधी मिळविण्यास सहाय्य करणे,

(ब) योग्य अशा पतवृध्दी उपाययोजनांद्वारे (credit enhancement measures) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी प्राप्त करावयाच्या भांडवलाचा व्याजदर कमी करण्यास मदत करणे,

(क) नागरिक हा केंद्रबिंदु मानून नागरी सेवांचा पुरवठा व त्यासाठीचे वित्त सहाय्य यामधील खाजगी व सामूहिक क्षेत्राच्या सहभागास उत्तेजन देणे,

(ड) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या पतक्षमतेमध्ये सुधारणा करणे,

(इ) क्षमतेचा विकास, प्रात्यक्षिक उपाययोजना आणि धोरण विषयक सुधारणा यांच्याद्वारे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थात्मक सुधारणा करणे आणि त्या टिकवून ठेवणे.

**(४) महाराष्ट्र नागरी मुलभूत सुविधा निधीची कार्ये पुढीलप्रमाणे असतील :-**

(अ) प्रकल्प निर्मिती (Project Development) - नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या वतीने प्रकल्प निर्मिती कामांसाठी निधी पुरविणे, प्रकल्प अहवाल तयार करुन घेणे आणि प्रकल्पांच्या संकल्पनेपासून प्रकल्पासाठी वित्तीय सहाय्य प्राप्त करण्यापर्यन्तच्या प्रक्रियेचे व्यवस्थापन करणे,

(ब) क्षमतेचा विकास (Capacity Building) - नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये प्रकल्प निर्मिती, कार्यान्वयन, संनियंत्रण व व्यवस्थापन याबद्दलची कौशल्ये विकसित करणे, त्यांच्या पतक्षमतेमध्ये वाढ करणे (भाडे नियंत्रणापासून मालमत्ता कर वेगळा करणे, जकातीच्या वसुलीचे खाजगीकरण, त्यांच्या मालमत्तेचे व्यवस्थापन आणि कर आकारणीचे सुसूत्रीकरण इत्यादीसारख्या उपाययोजनांद्वारे), सुविधा पुरविण्यातील कार्यक्षमता वाढविण्यासाठी उत्तेजन देणे आणि राज्य पातळीवर धोरणात्मक सुधारणा करण्यास मदत करणे,

(क) निधी उभा करण्यास सहाय्य (Facilitating Finance) - वित्तीय संस्थांकडून प्रत्यक्ष मार्गाने निधी मिळविण्यास आणि भांडवली बाजारातून निधी उभारण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना मदत करणे व कर्ज परतफेड राखीव निधीमार्फत वित्तीय हमी देणे.

(ड) <u>आंशिक कर्ज सहाय्य (Partial Direct Lending)</u> - बाजारातून कर्जाची आवश्यक ती रक्कम मिळविण्यामध्ये अडचणी येऊ शकतील अशा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या प्रकल्पांना निवडक स्वरुपात निधी उपलब्ध करुन देण्यासाठी प्रत्यक्ष कर्ज सहाय्य देणे. असे आंशिक कर्जसहाय्य बाजारातून कर्ज मिळण्यासाठी सहाय्यभूत ठरणारे असेल आणि ते कमाल मर्यादेच्या अधीन राहील. अर्थात अशा कर्ज सहाय्याची व्याप्ती या प्रयोजनासाठी उपलब्ध असलेल्या निधीवर अवलंबून राहील.

(इ) महाराष्ट्र नागरी मुलभूत सुविधा निधीच्या सुरुवातीला तयार केलेल्या कार्याच्या योजनेस या निधी अंतर्गत स्थापन करावयाच्या विश्वस्त कंपनी व मत्ता व्यवस्थापन कंपनी अंतीम स्वरुप देतील.

**(५) <u>विश्वस्त निधीतील अंशदान</u> :**

शासन विश्वस्त निधीमध्ये पहिल्या वर्षी रु.२५,००,००,०००/- (रु.पंचवीस कोटी फक्त) व दुस-या वर्षी रु.२६,००,००,०००/- (रु.सव्वीस कोटी फक्त) अंशदान देईल. तसेच वित्तीय संस्थांकडून कालांतराने निधी उपलब्ध झाल्यास त्याप्रमाणे अंशदान निधीतर्फे स्वीकारण्यात येईल.

**(६) <u>विश्वस्त कंपनीचे भागभांडवल</u> :**

शासन सुरुवातीला विश्वस्त कंपनीचे सर्व रु.१०,००,०००/- (रु.दहा लाख फक्त) भागभांडवल घेईल व विश्वस्त निधीमध्ये वित्तीय संस्थांनी जर कालांतराने अंशदान केले तर त्या अंशदानाच्या प्रमाणात त्यांनी विश्वस्त कंपनीचे भागभांडवल घेण्यास मान्यता देईल.

**(७) <u>मत्ता व्यवस्थापन कंपनीचे भागभांडवल</u> :**

(अ) मत्ता व्यवस्थापन कंपनीचे प्राधिकृत भागभांडवल (Authorised Capatil) रु.२,००,००,०००/- (रु.दोन कोटी फक्त) असेल व सुरुवातीचे अभिदत्त भागभांडवल (Subscribed Capital) रु.१,००,००,०००/- (रु.एक कोटी फक्त) असेल,

(ब) सुरुवातीच्या रु.१ कोटी अभिदत्त भागभांडवलापैकी रु.२५,००,०००/- (रु.पंचवीस लाख फक्त) (२५%) भागभांडवल शासन घेईल, रु.२४,००,०००/- (रु.चोवीस लाख फक्त) भागभांडवल मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण घेईल व रु.५१,००,००० (रु.एकावन्न लाख फक्त) (५१%) भागभांडवल वित्तीय संस्था घेतील,

(क) गरजेनुसार या कंपनीचे अभिदत्त भागभांडवल आणखी रु.१ कोटीने वाढविण्यात येईल,

(ड) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, १९७४ च्या कलम १६ए अंतर्गत मुंबई महानगर प्रदेश विकास प्रधिकरणाने मत्ता व्यवस्थापन कंपनीच्या सुरुवातीच्या रु.१ कोटी अभिदत्त भागभांडवलापैकी (Subscribed Capital) रु.२४लाखाचे (२४%) भाग भांडवल देण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. मत्ता व्यवस्थापन कंपनीचे अभिदत्त भागभांडवल रु.१ कोटीने वाढविल्यास त्यातील रु.२४लाखांचे (२४%) भागभांडवलही प्राधिकरणाने घेण्यास मान्यता देण्यात येते. मत्ता व्यवस्थापन कंपनीची नोंदणी करताना सुरुवातीला लागणारे रु.५ लाखाचे भागभांडवल एकूण भागभांडवलाच्या प्राधिकरणाच्या हिश्यातून देण्यास मान्यता देण्यात येत आहे,

(इ) मत्ता व्यवस्थापन कंपनीतील वित्तीय संस्थांच्या भागभांडवलापैकी सर्वात मोठा हिस्सा सिकॉमचा असेल व त्यामुळे कंपनीच्या दैनंदिन व्यवस्थापनाची जबाबदारी सिकॉम लि. घेईल. मत्ता व्यवस्थापन कंपनीच्या एकूण भागभांडवलापैकी सिकॉम लि.च्या वाट्याला कमाल ५१% तर किमान २६% ची मर्यादा असेल. इतर वित्तीय संस्थांच्या सहभागानुसार एकूण वित्तीय संस्थांचा (सिकॉमसह) एकत्रित वाटा ५१% वरुन ७४% पर्यन्त वाढू शकेल तसेच या अनुषगाने शासन व मुबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाचा एकत्रित वाटा ४९% वरुन २६% इतका कमी होऊ शकेल.

**(८) <u>विश्वस्त कंपनी व मत्ता व्यवस्थापन कंपनीचे संचालक</u> :**

विश्वस्त कंपनीच्या व मत्ता व्यवस्थापन कंपनीच्या संचालक मंडळावर शासनातर्फे खालील शासकीय अधिका-यांना प्रथम संचालक म्हणून याद्वारे नियुक्त करण्यात येत आहे :

१. प्रधान सचिव, नगर विकास विभाग.
२. सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
३. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण.

विश्वस्त निधीमध्ये वित्तीय संस्थांनी यथावकाश अंशदान केल्यास त्यांच्या अंशदानाच्या प्रमाणात विश्वस्त कंपनीमध्ये अशा वित्तीय संस्थांचे संचालक असतील. विश्वस्त कंपनीच्या अध्यक्षाची निवड शासन करेल.

मत्ता व्यवस्थापन कंपनीचे सुरुवातीला ७ संचालक असतील. यापैकी ४ सदस्य वित्तीय संस्था नेमतील. अध्यक्षाची (non-executive) आणि व्यवस्थापकीय संचालकांची / मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांची निवड शासन, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण व वित्तीय संस्था मिळून करतील. अध्यक्षांची नेमणूक करताना वित्तीय संस्थांसाठी

असलेल्या ४ संचालकांच्या जागांपैकी एक जागा वापरली जाईल व कंपनीच्या व्यवस्थापकीय संचालकांची नेमणूक करताना शासनाने नामनिर्देशित केलेल्या सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या संचालक पदाचा वापर केला जाईल.

(९) **विश्वस्त कंपनी व मत्ता व्यवस्थापन कंपनी यांचे सुरुवातीचे भागभांडवलदार :**

विश्वस्त कंपनी व मत्ता व्यवस्थापन कंपनीचे सुरुवातीचे भागभांडवल प्रत्येकी रु.५,००,०००/- (रु.पाच लाख फक्त) असेल. या कंपन्यांचे सुरुवातीचे भागभांडवलदार पुढीलप्रमाणे असतील :-

विश्वस्त कंपनी (प्रत्येकी रु.१०/- चा एक भाग)

(१) महाराष्ट्र शासनाने घ्यावयाचे भाग - ४९,९९४

(२) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, प्रधान सचिव, वित्त विभाग, सचिव, नगर विकास विभाग आणि संचालक, नगरपालिका प्रशासन हे प्रत्येकी एक भाग घेतील.

मत्ता व्यवस्थापन कंपनी (प्रत्येकी रु.१०/- चा एक भाग)

(१) मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने घ्यावयाचे भाग - ४९,९९४

(२) महाराष्ट्र शासनाचे मुख्य सचिव एक भाग घेतील.

(३) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, संचालक, नगरपालिका प्रशासन, व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि. आणि प्रमुख, नियोजन विभाग, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण हे प्रत्येकी एक भाग घेतील.

(१०) **नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी करावयाच्या परतफेडीसंबंधी शासनाचा हस्तक्षेप :**

महाराष्ट्र नागरी मुलभूत सुविधा निधीतर्फे प्रकल्प निर्मिती केलेल्या, कर्ज परतफेडीची हमी दिलेल्या आणि प्रत्यक्ष कर्ज दिलेल्या नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने प्रकल्प निर्मिती खर्च/ फी देण्यात अथवा कर्जाच्या परतफेडीत वा महाराष्ट्र नागरी मुलभूत सुविधा निधीला देय असलेल्या कोणत्याही रकमेची थकबाकी किंवा विलंब केल्यास अशा संस्थेस राज्य शासनाकडून द्यावयाच्या अनुदानातून शासनाकडून ती रक्कम परस्पर उपलब्ध करुन देण्यात येईल.

**(११) शासनाची विविध अनुदाने महाराष्ट्र नागरी मुलभूत सुविधा निधीमार्फत देणे :**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागासह शासनाच्या विविध विभागांतर्फे नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षमता विकासासाठी (Capacity Building) तसेच कार्यक्षमता सुधारण्यासाठी (efficiency improvements) नेमून दिलेली भांडवली अथवा इतर अनुदाने महाराष्ट्र नागरी मूलभूत सुविधा निधीमार्फत देण्यास याद्वारे तत्वत: मान्यता देण्यात येते.

**(१२) <u>सुकाणू समितीची स्थापना</u> :**

महाराष्ट्र नागरी मुलभूत सुविधा निधीला एकंदर मार्गदर्शन, कामकाजाचा आढावा, समन्वयात सुधारणा करणे आणि कामकाजातील अडथळे दूर करणे यासाठी खालीलप्रमाणे सुकाणू समिती स्थापन करण्यात येत आहे :

| | |
|---|---|
| मुख्य सचिव ---------- | अध्यक्ष |
| प्रधान सचिव, नियोजन विभाग | सदस्य |
| प्रधान सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| प्रधान सचिव, नगर विकास विभाग | सदस्य |
| सचिव, नगर विकास विभाग | सदस्य |
| सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य |
| संचालक, नगरपालिका प्रशासन | सदस्य |
| महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण | सदस्य |
| व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि. | सदस्य |
| व्यवस्थापकीय संचालक, मत्ता व्यवस्थापन कंपनी | सदस्य सचिव |

(१३) शासनाच्य निर्णयासंबंधी पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यासाठी प्रधान सचिव, नगर विकास विभाग यांना याद्वारे प्राधिकृत करण्यात येत आहे :

(अ) विश्वस्त निधीमध्ये शासनाचे अंशदान करणे व वित्तीय संस्थांचे अंशदान स्वीकारणे,

(ब) विश्वस्त कंपनीचे भागभांडवल घेणे व कालांतराने आवश्यक असल्यास यातील भागभांडवल वित्तीय संस्थांना देणे,

(क) मत्ता व्यवस्थापन कंपनीचे भागभांडवल घेणे आणि या कंपनीच्या भागभांडवलातील वित्तीय संस्था, शासन व मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्या हिश्यात बदल करणे,

(ड) शासनाच्या वतीने खालील विधीविषयक कागदपत्रांसह सर्व संबंधित विधीविषयक कागदपत्रांवर स्वाक्षऱ्या करणे.

(i) विश्वस्त कंपनी व मत्ता व्यवस्थापन कंपनीचे मेमोरँडम व आर्टिकल्स् ऑफ असोसिएशन,
(ii) भागभांडवलदारांचा करार (Sharehoulders' Agreement),
(iii) निधी व्यवस्थापन करार (Fund Management Agreement),
(iv) अंशदान करार (Contribution Agreement),
(v) इन्डेन्चर ऑफ ट्रस्ट,
(vi) महाराष्ट्र नागरी मुलभूत सुविधा निधीच्या स्थापनेसाठी आवश्यक अशी सर्व इतर कागदपत्रे,
(vii) महाराष्ट्र नागरी मुलभूत सुविधा निधीच्या स्थापनेसाठी व त्याची उद्दिष्टे साध्य करण्यासाठी आवश्यक असलेली इतर सर्व कार्यवाही करणे.

(१४) महाराष्ट्र नागरी मूलभूत सुविधा निधीसंबंधी विश्वस्त निधी, विश्वस्त कंपनी व मत्ता व्यवस्थापन कंपनी स्थापन करण्यासाठी रजिस्ट्रार ऑफ कंपनीज यांच्याकडे संबंधित कागदपत्रांची नोंदणी करण्यास, योग्य ते करार करण्यास व स्थापनेसंबंधी सर्व आवश्यक कार्यवाही करण्यास महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांस याद्वारे प्राधिकृत करण्यात येत आहे.

(१५) महाराष्ट्र नागरी मुलभूत सुविधा निधीच्या आंशिक कर्ज सहाय्य निधीमधून कर्ज सहाय्य देताना संबंधित स्वराज्य संस्थांना इतर वित्तिय संस्थांमार्फत उपलब्ध होणा-या वित्तिय सहाय्याशी सांगड घालण्यात यावी.

(१६) हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७३०/व्यय-३, दिनांक २७.०६.२००२ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

१०/०७/२००२

(उमाकांत दांगट)
महाराष्ट्र शासनाचे उपसचिव

प्रत :

मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव
प्रधान सचिव, नियोजन विभाग
प्रधान सचिव, वित्त विभाग
प्रधान सचिव, नगर विकास विभाग
सचिव, नगर विकास विभाग
सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
संचालक, नगरपालिका प्रशासन
महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण
व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम लि.
व्यवस्थापकीय संचालक, सिडको
महासंचालक, माहिती व जनसंपर्क
सर्व महापालिका आयुक्त
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व उपसचिव, नगर विकास विभाग
निवडसूची /नवि-१०